# ॥ श्री योगेश्वरी पञ्चकम् ॥



॥श्रीगणेशाय नमः॥

योगेशा सुरपूजिता भगवती त्रैलोक्यमन्दाकिनी ।
देवेशा गिरिजा महेश्वरमया ब्राह्मी महायोगिनी ॥
विद्या शान्तिकरा तथैव कमला बाला च नारायणी ।
पुत्रोऽहं नु तवास्मि चारुवदने मातर्प्रसन्ना भव ॥ १ ॥
आम्राकारमुखं प्रफुल्लकमलं सौभाग्यरेखाङ्कितम् ।
ताम्बूलं च मुखे प्रसन्नवदनं सिन्दूरमालेपनम् ॥
सर्वानर्थहरं सदा शुभकरं ह्यक्ष्णोः प्रद्योतनम् ।
पुत्रोऽहं नु तवास्मि चारुवदने मातर्प्रसन्ना भव ॥ २ ॥
मालापद्मधरा चतुर्भुजधरा योगेश्वरी शर्वरी ।
ध्वान्तारातिसमस्तलोकजननी माहेश्वरी श्रीकरी ॥
नानारूपधरी सदा शुभकरी भूलोकलोकेश्वरी ।
पुत्रोऽहं नु तवास्मि चारुवदने मातर्प्रसन्ना भव ॥ ३ ॥
कूष्माण्डा च रमा तथैव च शिवा कात्यायनी पार्वती
गायत्री कमलासना भगवती विष्णोश्च पद्मावती ।
सावित्री परमा सदाशिवनिभा कौमारी सा वैष्णवी
पुत्रोऽहं नु तवास्मि चारुवदने मातर्प्रसन्ना भव ॥ ४ ॥
नानादैत्यविनाशिनी भगवती ब्रह्मण्यरक्षाकरी ।
वेदानां च सरस्वती भगवती देवी दयासागरी ॥
सीता रामपरायणा खलु सती दुर्गा च रामेश्वरी ।
पुत्रोऽहं नु तवास्मि चारुवदने मातर्प्रसन्ना भव ॥ ५ ॥
योगेश्वरि जगन्मातः पितः शम्भो महेश्वर । रामकृष्णस्य शिष्याय यशो ज्ञानम् प्रयच्छतम् ॥

-डॉ. पुष्कराज उदय वर्तक

डॉ. पुष्कराज उदय वर्तक 9969020588 pushkarajgem@gmail.com

योगेश्वरी सुरपूजिता , त्रैलोक्य ( जोडणारी, समृद्ध करणारी ) नदी आहे ; भगवती आहे , देवेशा, हिमालयपुत्री, महादेवप्रिया, ब्राह्मिस्थितीप्राप्त महायोगिनी आहे ; विद्या-शान्ती देणारी तसेच कमला - कुमारी-नारायणी रूप घेणारी आहे. हे माते! हे सुमुखी ! मी तुझा पुत्र आहे, माझ्यावर प्रसन्न हो. ॥ १ ॥
( तुझे ) मुख कुंकवाने युक्त , आम्रफलाकार, जणुं उमललेले कमळ ; मुखी ताम्बूल, प्रसन्नवदन, ( त्यावर ) शेंदूराचे आलेपन आहे ; दृष्टीचे तेज सर्व अनर्थाचा नाश करणारे , सदा शुभ करणारे आहे ; हे माते! हे सुमुखी ! मी तुझा पुत्र आहे, माझ्यावर प्रसन्न हो. ॥ २ ॥
योगेश्वरीचे शर्वरी रूप माला -पद्म धारी , चतुर्भुज आहे ; जी संपत्करी माहेश्वरी सूर्ययुक्त सकल लोकांची जननी आहे; नानारूपधारी, सदा सुखकारक, भूलोकाची लोकेश्वरी आहे ; त्या हे माते! हे सुमुखी ! मी तुझा पुत्र आहे, माझ्यावर प्रसन्न हो. ॥ ३ ॥
( तिची उपरोक्त नाना रूपे -) जी कूष्मांडा ( याचा एक अर्थ कार्यनाश करणारी असा होतो . काही वेळा भक्त आपल्या बुद्धीप्रमाणे असे काही कार्य योजतो ज्यात त्याचे हित नसते . पण आपल्या बाळाचे हित यात नाही, हे जाणून त्या विपरित फलदायी कार्याचा नाश करणारी अशी आई ), रमा तसेच उमा, कात्यायनी, पार्वती, कमलासना, गायत्री, भगवती, विष्णूंची पद्मावतीदेवी , श्रेष्ठ अशी सावित्री , सदाशिवांची रमणी , कौमारी, वैष्णवी आहे; त्या हे माते! हे सुमुखी ! मी तुझा पुत्र आहे, माझ्यावर प्रसन्न हो. ॥ ४ ॥
अनेक दैत्यांचा ( आसुरी प्रवृत्तींचा ) संहार करणारी भगवती ब्रह्मण्याचे रक्षण करणा री आहे , वेदांची सरस्वती ( ज्ञाती ) दयासागर देवी आहे ; रामप्रभूंची सीता-(जगात जी जी असेल ती ) महापतिव्रता-दुर्गा-रामवरदायिनी या रूपांनी व्यक्त शक्ती आहे ; त्या हे माते! हे सुमुखी ! मी तुझा पुत्र आहे , माझ्यावर प्रसन्न हो. ॥ ४ ॥
हे जगन्माते योगेश्वरी ! हे पिता महादेव ! रामकृष्णाच्या ( या ) शिष्याला आपण यश आणि ज्ञान प्रदान करावे. -डॉ. पुष्करराज उदय वर्तक